महाराष्ट्राच्या पर्यटन जलद विकासार्थ
राज्यस्तर उच्चाधिकारी स्थायी समितीची
व जिल्हास्तर समितीची स्थापना करणे.

महाराष्ट्र शासन
समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग
शासन निर्णय क्र. एमटीसी १०९०/प्र.क्र.८८/पर्यटन
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २२ एप्रिल, १९९०

<u>शासन निर्णय</u>:- देशात पर्यटनास मिळणारा वाढता प्रतिसाद लक्षात घेऊन व महाराष्ट्रातील विवि. आकर्षक निसर्गरम्य स्थळे, ऐतिहासिक स्थळे व धार्मिक स्थळांचा विकास प्राधान्याने करता येणे शक्य व्हावे यासाठी व शासनाच्या संबंधीत विविध विभागांच्या समन्वयाने हे काम त्वरेने व्हावे यासाठी राज्यस्तरावर एका उच्चाधिकार स्थायी समितीची स्थापना करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्यास अनुसरून शासन आता खालील अधिकाऱ्यांची एक राज्यस्तर उच्चाधिकार समिती नियुक्त करण्यास मान्यता देत आहे :-

| | |
|---|---|
| १] मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २] अतिरिक्त मुख्य सचिव [महसूल] | सदस्य |
| ३] प्रधान सचिव [वित्त] | सदस्य |
| ४] सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ५] सचिव, ग्राम विकास विभाग | सदस्य |
| ६] सचिव, उर्जा व पर्यावरण विभाग | सदस्य |
| ७] सचिव [वन विभाग] | सदस्य |
| ८] सचिव [नगर विकास] | सदस्य |
| ९] सचिव [नियोजन विभाग] | सदस्य |
| १०] सचिव [शिक्षण विभाग] | सदस्य |
| ११] व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई | सदस्य |
| १२] सचिव [पर्यटन] | सदस्य-सचिव |

२. या उच्चाधिकार स्थायी समितीने खालील बाबींवर विचार करून आपला निर्णय शासनास सादर करावा. सदर निर्णयाची अंमलबजावणी शासनाच्या सर्व विभागावर बंधनकारक राहील:-

१] महाराष्ट्रातील दूरवरच्या, डोंगर-दऱ्यांवरील/समुद्र किनाऱ्यावरील विविध पर्यटन स्थळांपर्यंत जाण्यासाठी योग्य असे रस्ते तयार करण्याच्या कामास प्राधान्य देण्याबाबत शिफारस करणे

२] सर्व पर्यटन स्थळांना आवश्यक असा पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करण्याच्या योजनांना प्राधान्य देण्याबाबत शिफारस करणे.

३] सर्व अंतर्गत भागातील पर्यटन स्थळांना प्राधान्याने वीजपुरवठा करण्याबाबत शिफारस करणे.

कृ.मा.प...२/-

४) सर्व ठिकाणच्या पर्यटन स्थळे विभागात आवश्यक वैद्यकीय सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत शिफारस करणे

५) काही आकर्षक पर्यटन ठिकाणांचा विकास करण्यासाठी खाजगी उद्योजकांना प्रोत्साहन देण्याबाबत पर्यटन विकास महामंडळाच्या सहकार्याने विचार करणे.

६) काही महत्वाच्या ठिकाणांना पर्यटन विकास क्षेत्र म्हणून घोषित करण्याबाबत शिफारस व सदरील ठिकाणी हॉटेल्स/मोटेल्स निर्माण करण्याबाबत शिफारस करणे

७) जेथे शक्य असेल तेथे पर्यटकांना विमान सेवा उपलब्ध करुन देण्याच्या योजनेस प्राधान्य देणे.

३. राज्यस्तर उच्चाधिकार स्थायी समितीबरोबर जिल्हास्तरावर पर्यटन विषयक विकासाची कामे त्वरेने हाती घेणे शक्य व्हावे व त्याची अंमलबजावणी प्राधान्याने व्हावी म्हणून खालील अधिकाऱ्यांची जिल्हास्तर समिती स्थापन करण्यासही शासन मान्यता देत आहे.

| | |
|---|---|
| १) जिल्हाधिकारी , | अध्यक्ष |
| २) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ३) विभागीय वन अधिकारी | सदस्य |
| ४) कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग(राज्य). | सदस्य |
| ५) कार्यकारी अभियंता, पाटबंधारे विभाग(राज्य) | सदस्य |
| ६) जिल्हा नियोजन अधिकारी | सदस्य |
| ७) विभागीय व्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, | सदस्य |
| ८) निवासी उपजिल्हाधिकारी | सदस्य-सचिव |

४. सदर जिल्हास्तर समितीने उच्चाधिकार स्थायी समितीकडून प्राप्त झालेल्या निर्णयाची त्वरित अंमलबजावणी करण्याबाबत कार्यवाही करावी व यासाठी संबंधीत जिल्ह्यातील पर्यटन विकास व विस्तार विषयक प्रस्ताव आल्यास जिल्हा नियोजन विकास मंडळाच्या सहमतीने राज्यस्तर उच्चाधिकार स्थायी समितीस सादर करावे. इतरही संबंधीत बाबींमध्ये आवश्यक असल्यास राज्यस्तर उच्चाधिकार स्थायी समितीचे मार्गदर्शन घ्यावे.

पृ.पुढे पहा...

५. १) राज्यस्तर उच्चाधिकार स्थायी समितीस पर्यटन विषयक विकासाच्या कामाचे समन्वय [जी महत्वाची ठिकाणे/विभाग पर्यटन विकास क्षेत्र म्हणून घोषित करणे, २) पर्यटकांना आकर्षित करणाऱ्या पर्यटन स्थळांसाठी आवश्यक सुविधा उपलब्ध करणे, ३) जिल्हास्तर समितीस मार्गदर्शन करणे, ४) सर्व संबंधीत विभागांना पर्यटन विषयक योजनांना प्राधान्य देण्याबाबत सूचना देणे इत्यादी कामेही सुपूर्द करण्यात येत आहेत.

६. हा शासन निर्णय ~~वित्त विभाग~~ नियोजन विभागाच्या सहमतीनुसार व मुख्य सचिव यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

[ इंदा गोसावी ]
कार्यासन अधिकारी.

प्रति:

सामान्य प्रशासन विभाग,
वित्त विभाग,
सार्वजनिक बांधकाम विभाग,
नियोजन विभाग,
पाटबंधारे विभाग,
पर्यावरण व ऊर्जा विभाग,
मंत्रालयातील इतर सर्व विभाग,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व निवासी जिल्हाधिकारी,
मुख्य प्रशासकीय अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदा